सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जि.पालघर, यांना देण्यात यावयाच्या अनुदानाचे वाटप मुख्य लेखाशिर्ष-२४१५ ०३१ २.
(पहिला हप्ता) ( माहे एप्रिल ते **जून**,२०२० )

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०२०/प्र.क्र. ३८/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
दिनांक : १३ मे, २०२०.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- प्रशिक्षण ११९९/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८
३) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.

**शासन निर्णय-**

मागणी क्र. एल ३ मुख्य लेखाशिर्ष "२४१५ - (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, संकेतांक क्रमांक २४१५ ०३१२" ३१ सहायक अनुदान (वेतनेतर), ३६ सहायक अनुदान (वेतन) या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जि. पालघर यांना वेतनेतरसाठी रु. ०९.०० लक्ष (रु.नऊ लक्ष )व वेतनासाठी रु.२६.०२ लक्ष (रु. सव्वीस लक्ष, दोन हजार) असे रु. ३५.०२ लक्ष (रु.पस्तीस लक्ष, दोन हजार फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

२. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या माहे एप्रिल ते जून, २०२० या कालावधीकरिता वेतनासाठी रु.३.९०३ लक्ष (रु.तीन लक्ष, नव्वद हजार तीनशे) इतके अनुदान उपलब्ध करुन दिले आहे. सदरहू अनुदान ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जि. पालघर यांना या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या

अनुंषगाने उपायुक्त (आस्था), कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भात दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा खर्च मागणी क्र.एल ३,"२४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण" (पी) (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र संकेतांक क्र. (२४१५ ०३१२) ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे.सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना), हे काम पाहतील.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतनेतर व वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे. याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

७. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना प्रचलित निकष वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाच्या दि.१६ एप्रिल, २०२० च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे संबंधितांनी काटेकोरपणे पालन करावे.

८. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

९. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून व

वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र. ६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००५१३१५०५१३०१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashank Yashwant Barve

Digitally signed by Shashank Yashwant Barve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4f19736b62993d2c7e716a76cdcfdaa8a6a08fc2f15bfd41fed42ec7306bf1e8, cn=Shashank Yashwant Barve
Date: 2020.05.13 16:27:06 +05'30'

**( शशांक य. बर्वे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई (२ प्रती)
२. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर, जिल्हा पालघर
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
७. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जिल्हा पालघर.
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७, ग्राम विकास विभाग
११. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.